**विभागांतर्गत कार्यरत असणा-या वसतीगृह,आश्रमशाळा या ठिकाणी बायोमेट्रीक उपस्थिती प्रणाली संयंत्रे पुरवठा करण्यास झालेला विलंब या संदर्भात चौकशी करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विपआ -२०१५/ प्र.क्र. १७३/शिक्षण-२**
**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : २७ ऑक्टोबर, २०१५**

**वाचा :- शासन निर्णय,क्र.बीसीएच-२०१०/प्र.क्र.१८/मावक-४, दि. ३०/३/२०११.**

**प्रस्तावना -**

विभागांतर्गत कार्यरत असणारे शासकीय व अनुदानीत वसतीगृह आणि अनुदानीत तत्वावरील अनुसूचित जातीच्या आश्रमशाळा, अपंग शाळा तसेच विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गासाठी विभागांतर्गत कार्यरत असणा-या अनुदानीत आश्रमशाळा या ठिकाणी बायोमेट्रीक उपस्थिती प्रणाली लागू करण्यास उपरोक्त शासन निर्णय, दि. ३०/३/२०११ अन्वये शासनाने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार सदर वसतीगृह व आश्रमशाळांमध्ये बायोमेट्रीक संयंत्राचा पुरवठा आदेश देण्यात आलेले आहेत. सदर पुरवठा व त्यांचे कार्यान्वयना या संदर्भात विधान परिषदेत नियम ९३ अन्वये सूचना उपस्थित झालेली होती. या अनुषंगाने सदर प्रकरणी चौकशी होणे आवश्यक असल्याने त्याकरिता चौकशी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

विभागांतर्गत कार्यरत वसतीगृह व आश्रमशाळांमध्ये बायोमेट्रीक संयंत्राचा पुरवठा आदेश देण्यात आलेले आहेत. सदर पुरवठा आदेशान्वये व करारनाम्यातील अटी व शर्तीनुसार बायोमेट्रीक संयंत्राचा पुरवठा विहित कालावधीत करण्यात आला आहे किंवा कसे, पुरवठा केलेली बायोमेट्रीक संयंत्रे सर्व ठिकाणी कार्यान्वित झाली आहेत किंवा कसे, तसेच जी संयंत्रे कार्यान्वित झालेली नाहीत ती कार्यान्वित न होण्याची कारणे काय आहेत इ.मुद्दयांबाबत चौकशी करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | पदनाम | समितीचे पद |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | अध्यक्ष |
| २ | आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे | सदस्य |
| ३ | सह/उप सचिव (शिक्षण-२), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | सदस्य सचिव |

२. वरील समितीने आपला अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्यात शासनास सादर करावा.

३.   सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२७१६३४०३७६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pratap P Lubal

Digitally signed by Pratap P Lubal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pratap P Lubal
Date: 2015.10.27 16:36:19 +05'30'

**(प्र.पां.लुबाळ)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. सह सचिव, (शिक्षण-२), सा.न्या. व वि. स. वि., मंत्रालय,मुंबई
८. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
९. सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण
१०.सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
११.निवड नस्ती, (शिक्षण-२).